राज्याचे सौर कृषिपंप आस्थापित करण्याचे
एकत्रित धोरण

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सौरप्र-२०१४/प्र.क्र.२१९/ऊर्जा-७**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम रोड,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीखः -२७ मार्च,२०१५.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने राष्ट्रीय स्तरावर १ लाख नग सौर कृषिपंपाच्या योजनेसाठी रु. ४००.०० कोटी एवढी तरतूद घोषित केली आहे. या अंतर्गत राज्यासाठी ७५४० नग सौर कृषिपंपांचे उदिष्ट निश्चित केले आहे. वित्त वर्ष २०१४-१५ मध्ये ३०% प्रमाणे रु १३३.५० कोटी एवढे केंद्रीय वित्त सहाय्य उपलब्ध होणार आहे.

राज्यात बहुतांश वीजनिर्मिती औष्णिक पद्धतीने होत आहे. त्यामुळे वायू प्रदुषणात भर पडत असून हवामानावर विपरित परिणाम होत आहे. यासाठी वापरण्यात येणारी खनिज संपत्ती ठराविक प्रमाणात आहे. पर्यावरणास पोषक तसेच दीर्घकालीन ऊर्जा सुरक्षेच्यादृष्टीने अपारंपरिक ऊर्जा स्त्रोतांचा ऊर्जा निर्मितीसाठी वापर करणे आवश्यक आहे. त्यामुळे राज्य शासनाने अपारंपरिक ऊर्जा स्त्रोतांचा विकास घडवून आणण्यासाठी प्रोत्साहनात्मक धोरणे वेळोवेळी जाहीर केली आहेत. अपारंपरिक ऊर्जा स्त्रोतांपैकी सौर ऊर्जा हा स्त्रोत शाश्वत व निरंतर स्वरुपाचा व महत्वाचा आहे.

महाराष्ट्र हे एक कृषिप्रधान राज्य आहे. नियमित विद्युत पुरवठा किंवा विद्युत जोडणी नसल्यामुळे शेती उत्पन्नावर अवलंबून असलेल्या शेतकऱ्यांवर पर्यायाने राज्यावर विपरीत परिणाम होत आहे. शेतकऱ्यांना सवलतीच्या दरात वीज पुरवठा करण्यासाठी वितरण कंपनीला अनुदान द्यावे लागत आहे. औष्णिक पद्धतीच्या वीज निर्मितीमुळे पर्यावरणाचा ऱ्हासही होत आहे. त्यामुळे, राज्यातील शेतकऱ्यांना, त्यांच्याकडील जलसिंचनासाठीच्या जमिनीचे क्षेत्र ज्या भागात आहे, त्यानुसार केंद्रीय अनुदान, राज्याचे अनुदान व / किंवा लाभार्थींचा हिस्सा विचारात घेऊन सौर कृषिपंप देण्याची योजना विचाराधीन होती. सदर योजना राबविण्यास मंत्रीमंडळाने दिनांक २४.२.२०१५ रोजीच्या बैठकीत मान्यता दिलेली आहे.

**शासन निर्णयः-**

विहित केलेल्या पात्रता व प्राथम्यक्रमानुसार ५ एकरपेक्षा कमी जमिनीचे क्षेत्र असणाऱ्या शेतकऱ्यांना ३,५ किंवा ७.५ एच.पी. क्षमतेचे सौर कृषिपंप देण्याच्या/आस्थापित करण्याच्या योजनेस मान्यता देण्यात येत आहे.

**२. लाभार्थी निवडीचे निकष :**

२.१ योजनेचा लाभ घेण्यासाठी लाभार्थींचे वर्गीकरण पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे :-

१) राज्यातील अकोला, अमरावती, वाशिम, बुलढाणा, यवतमाळ व वर्धा या आत्महत्याग्रस्त जिल्ह्यांतील शेतकरी.

२) महाराष्ट्र शासनाच्या धडक सिंचन योजनेंतर्गत विहीरींचा लाभ घेतलेले लाभार्थी शेतकरी.

३) अतिदुर्गम भागातील शेतकरी.

४) राज्यातील पारंपरिक पद्धतीने विद्युतीकरण न झालेल्या गावांतील शेतकरी.

५) विद्युतीकरणासाठी वन विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र मिळत नसलेल्या भागांतील शेतकरी .

६) महावितरण कंपनीकडे पैसे भरुन प्रलंबित असलेल्या ग्राहकांपैकी ज्यांना तांत्रिक अडचणींमुळे नजिकच्या काळात वीजपुरवठा शक्य नाही असे शेतकरी .

७) उपरोक्त निकषांनुसार लाभार्थी शेतकरी जेथे सौर कृषीपंप बसवायचा आहे त्या शेतजमीनीचा मालक संबंधित लाभार्थी असणे गरजेचे आहे तसेच सदरील शेतजमीनीचे क्षेत्र ५ एकर पेक्षा अधिक असू नये व शेतीला सिंचनासाठी विहिर उपलब्ध असणे गरजेचे आहे व त्या विहिरीला सिंचनासाठी पुरेसे पाणी उपलब्ध असणे गरजेचे आहे.

२.२. राज्य शासनाने ठरवून दिलेल्या निकषांनुसार लाभार्थ्यांची निवड या शासन निर्णयाद्वारे स्थापन करावयाच्या जिल्हास्तरीय समितीद्वारे करण्यात येईल. उपरोक्त निकषानुसार, लाभार्थ्यांची यादी आणि प्राधान्यक्रम जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखालील समितीकडून ठरविण्यात येईल. सदर यादीनुसार आणि प्राधान्यक्रमानुसार योजनेची अंमलबजावणी महावितरणमार्फत करण्यात येईल. राज्य शासनाची महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा) या मूलाधार संस्थेकडून तांत्रिक सहाय्य करण्यात येईल.

२.३ योजनेसाठी उद्दिष्टाच्या मर्यादेमध्ये प्रथम येणाऱ्यास प्रथम प्राधान्य देण्यात येईल. तसेच आत्महत्याग्रस्त जिल्ह्यांमध्ये राबविण्यात आलेल्या धडक सिंचन योजनेंतर्गत विहीरींचा लाभ घेतलेल्या लाभार्थींना प्राधान्यक्रम देण्यात येईल.

२.४ ज्यांच्या गटामध्ये / विहीरीवर सद्या चालू वीज पंप आहे, असे शेतकरी या योजनेस पात्र राहणार नाहीत. या योजनेचा फायदा घेऊन ज्या गटांमध्ये / विहीरीवर सौर पंप दिला आहे, तेथे वीज पंपाची नवीन जोडणी महावितरणतर्फे दिली जाणार नाही.

२.५ वैयक्तीक किंवा सामुदायिक शेततळी व विहिरी यांसाठी ३ एच.पी.क्षमतेपर्यंतचे सौर पंप गरजेप्रमाणे आस्थापित करता येतील.

**३. योजनेची उद्दिष्टे:**

केंद्रशासनाच्या योजनेनुसार महाराष्ट्र राज्यात एकूण ७,५४० सौर कृषीपंपांचे उद्दिष्ट देण्यात आलेले आहे. या योजनेचा लाभ व उद्दिष्ट हे केंद्र शासनाच्या ध्येय धोरणानुसार व उपलब्ध वित्तीय सहाय्यावर अवलंबून राहील.

**४.योजनेसाठी आवश्यक निधी व निधीचे स्त्रोत :-**

४.१ सदर योजनेसाठी प्रतिपंप खर्च व निधीची तरतूद दर्शविणारा तक्ता खालीलप्रमाणे आहे:-

**(रक्कम रुपयांत)**

| अ. क्र. | सौर पंपाचा प्रकार व क्षमता (एच.पी) | आवश्यक जमिनीचे क्षेत्र | केंद्र शासनाने निश्चित केलेली आधारभुत किंमत | केंद्र शासनाचे अनुदान (३०%) | राज्य शासनाचे अनुदान (५%) | लाभार्थी हिस्सा (५%) | घ्यावयाचे कर्ज (६०%) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | ३ अश्वशक्ती ए.सी.पंप | ५ एकर पेक्षा कमी | ३,२४,०००/- | ९७,२००/- | १६,२००/- | १६,२००/- | १,९४,४००/- |
| २ | ३ अश्वशक्ती डी.सी. पंप | ५ एकर पेक्षा कमी | ४,०५,०००/- | १,२१,५००/- | २०,२५०/- | २०,२५०/- | २,४३०००/- |
| ३ | ५ अश्वशक्ती ए.सी.पंप | ५ एकर पेक्षा कमी | ५,४०,०००/- | १,६२,०००/- | २७,०००/- | २७,०००/- | ३,२४,०००/- |
| ४ | ५ अश्वशक्ती डी.सी.पंप | ५ एकर पेक्षा कमी | ६,७५,०००/- | २,०२,५००/- | ३३,७५०/- | ३३,७५०/- | ४,०५,०००/- |
| ५ | ७.५ अश्वशक्ती ए.सी.पंप | ५ एकर पेक्षा कमी | ७,२०,०००/- | २,१६,०००/- | ३६,०००/- | ३६,०००/- | ४,३२,०००/- |

४.२ या योजनेमध्ये केंद्र शासनाचे ३० % वित्तिय अनुदान असून राज्य शासनाने किमान ५ % हिस्सा अनुदान स्वरुपात उपलब्ध करुन दयावा व उर्वरित ६५ % रक्कमेपैकी लाभार्थीने ५ % रक्कम भरुन ६०% कर्जस्वरुपात उपलब्ध करावी असे केंद्राच्या योजनेमध्ये अभिप्रेत आहे. तथापि, महाराष्ट्रामध्ये ही योजना विदर्भातील आत्महत्याग्रस्त जिल्हयांमध्ये आणि अतिदुर्गम आदिवासी भागांमध्ये राबविली जाणार असल्यामुळे लाभार्थींचा हिस्सा कमीत कमी ठेवून उर्वरित रक्कम वित्तिय संस्थेमार्फत कर्जाच्या स्वरुपात घेण्यात येईल. सदर कर्जाची परतफेड महावितरण कंपनीद्वारे टप्प्या-टप्प्याने करण्यात येईल. सौर कृषि पंपाची क्षमतेनुसार संख्या व त्याचा खर्च तसेच खर्चातील सहभाग खालीलप्रमाणे राहील:-

| सौर पंप क्षमता | संख्या | अंदाजित रक्कम (रु. कोटी) |
|---|---|---|
| ३ अश्वशक्ती (ए.सी. व डी.सी. ५०% प्रत्येकी) | १००० | ३६.४५ |
| ५ अश्वशक्ती (ए.सी. व डी.सी. ५०% प्रत्येकी) | ५५४० | ३३६.५६ |
| ७.५ अश्वशक्ती (ए.सी.) | १००० | ७२.०० |
| **एकूण** | **७५४०** | **४४५.०१** |

सदर अंदाजित (रु.४४५.०१ कोटी) खर्चामध्ये खालीलप्रमाणे सहभाग अपेक्षित.

| अ.क्र. | तपशील | वित्त वर्ष २०१४-१५ (रु.कोटी) |
|---|---|---|
| १) | केंद्र शासनाचे अनुदान (३०%) | १३३.५० |
| २) | राज्य शासनाचे अनुदान ( ५%) | २२.२५ |
| ३) | लाभार्थींचा हिस्सा (५%) | २२.२५ |
| ४) | घ्यावयाचे कर्ज (६०%) | २६७.०१ |
| | **एकूण** | **४४५.०१** |

## ५. योजनेच्या देखरेखीसाठी सुकाणू (Steering Committee) समितीची स्थापना:-

सदर योजना महावितरण व महाऊर्जा यांच्या समन्वयाने राबविण्यात येईल. या योजनेची विहित कालबध्दतेत अंमलबजावणी करण्याकरिता सुकाणू (Steering Committee) समितीची स्थापना करण्यात येईल. त्या समितीचे सदस्य पुढील प्रमाणे असतील:-

| | |
|---|---|
| प्रधान सचिव (ऊर्जा) | अध्यक्ष |
| व्यवस्थापकीय संचालक,महावितरण | सदस्य सचिव |
| महासंचालक, महाऊर्जा | सदस्य |
| आयुक्त,कृषि | सदस्य |
| संचालक, भू-जल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा | सदस्य |
| संचालक (प्रकल्प), महावितरण | सदस्य तथा समन्वयक |
| संचालक (वित्त), महावितरण | सदस्य |
| महाव्यवस्थापक, महाऊर्जा | सदस्य |

उपरोक्त समितीचे काम खालीलप्रमाणे राहील

अ) योजनेची कार्यपध्दती निश्चित करणे.

ब) योजना राबवितांना येणाऱ्या अडचणी दूर करणे.

क) गुणवत्ता आश्वासन (Technical Assurance)

ड) योजनेचे काम वेळेत पूर्ण करण्याबाबत योजनेच्या कामावर नियंत्रण

इ) सौर पंपाचे जिल्हा निहाय उद्दिष्ट ठरवणे

सदरील योजना केंद्र पुरस्कृत असल्याने या योजनेतील खर्चाचा व्यवस्थित ताळेबंद राहण्यासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष वित्त विभागाच्या मान्यतेने घेण्यात येईल. सदरील योजनेच्या जमाखर्चाची जबाबदारी महाऊर्जा व महावितरणची राहिल.

**६. लाभार्थी निवड करण्यासाठी जिल्हा पातळीवर समिती :-**

या योजनेअंतर्गत लाभार्थ्यांची निवड करण्यासाठी जिल्हा पातळीवर समिती गठीत करण्यात येईल. सदरील समितीमध्ये पुढीलप्रमाणे सदस्य असतील.

| | |
|---|---|
| जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| अधीक्षक अभियंता, महावितरण | सदस्य सचिव |
| जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी | सदस्य |
| वरिष्ठ वैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा | सदस्य |
| महाऊर्जाचे अधिकारी | सदस्य |

उपरोक्त समितीची खालीलप्रमाणे जबाबदारी राहील.

अ) विहीर / कूपनलिका व पाण्याची पातळी तसेच पीक प्रकार इ. यानुसार तांत्रिक सर्वेक्षण करून वास्तविक (actual) सौरकृषी पंप क्षमता ठरविण्यासाठी अधीक्षक अभियंता, महावितरण; जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी; तसेच महाऊर्जा यांनी निर्देशित केलेले अधिकारी यांची उपसमिती प्रत्येक जिल्ह्यात स्थापन करण्यात येईल. या उपसमितीकडून तांत्रिक सर्वेक्षणाचे व सौर कृषि पंप क्षमता ठरविण्याचे काम करून घेणे.

ब) योजनेच्या उपरोक्त निकषांनुसार पात्र लाभार्थ्यांची यादी तयार करणे

क) पात्र लाभार्थ्यांच्या यादीतून सुकाणू समितीने ठरवून दिलेल्या जिल्हानिहाय उद्दिष्टानुसार अंतिम लाभार्थ्यांची निवड करणे

संबंधित जिल्हाधिकारी कार्यालयाकडून अंतिम लाभार्थ्यांच्या यादीतून कामाचा प्राधान्यक्रम ठरवून देण्यात येईल. या यादीतील प्राधान्यक्रमानुसार योजनेची अंमलबजावणी महावितरणमार्फत करण्यात येईल.

**७. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी खालीलप्रमाणे कार्यपद्धती विहित करण्यात येत आहे:-**

१. महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा) ही केंद्र शासनाची मूलाधार संस्था असल्याने या पथदर्शी योजनेकरिता आवश्यक तांत्रिक मापदंड (Technical Specification) केंद्र शासनाच्या नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालयाच्या सल्ल्याने महाऊर्जाकडून देण्यात येतील.

२. राज्यामध्ये ऑफ ग्रीड सौर कृषि पंप पथदर्शी योजना ऊर्जा विभाग(महाराष्ट्र शासन),जिल्हाधिकारी, महावितरण व महाऊर्जा यांच्या समन्वयाने राबविण्यात येईल.

३. या योजनेअंतर्गत केंद्रीय वित्तीय सहाय्याबरोबर महाऊर्जास मिळणा-या प्रशासकीय खर्चाच्या रकमेतून पुढीलप्रमाणे खर्च करण्यात येईल. या योजनेच्या प्रसिध्दीसाठी जिल्हाधिका-यांच्या अध्यक्षतेखालील समितीस ३० टक्के व अंमलबजावणी यंत्रणा म्हणून महावितरण कंपनीस ३० टक्के रक्कम महाऊर्जाकडून वेळोवेळी वर्ग करण्यात येईल.

४. योजनेतील ऑफ ग्रीड सौर कृषिपंपासाठी शासनाने ठरविलेल्या निकषानुसार लाभार्थ्यांची निवड जिल्हास्तरीय समितीमार्फत करण्यात येईल व पात्र लाभार्थ्यांकडून सौर कृषीपंप बसविण्यासाठी आवश्यक लाभार्थी हिस्सा महावितरणच्या संबंधीत जिल्हास्तरीय कार्यालयामार्फत जमा करण्यात येईल.

५. सदर योजनेचे संपूर्ण काम १००% टर्न-की पद्धतीने ई-निविदेद्वारे महावितरणमार्फत कंत्राटदाराची नेमणूक करून करण्यात येईल.

६. नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय, भारत सरकार यांनी ठरविलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार सौर कृषिपंपाचे तांत्रिक मानदंड (Technical Specification) बनविण्याची जबाबदारी महाऊर्जाची राहील.

७. सौर ऊर्जा कृषीपंप हे एक विशेष (Special) तंत्रज्ञान असल्यामुळे गुणवत्ता नियंत्रण हा या योजनेसाठीचा अत्यंत महत्त्वाचा घटक आहे. या संदर्भात सौर ऊर्जा विषयक नैपुण्य महाऊर्जाकडे आहे. तसेच शेतीविषयक नैपुण्य कृषि विभागाकडे असून महावितरणकडे अंमलबजावणीचे काम आहे. सदर बाब पाहता वरीलप्रमाणे अधीक्षक अभियंता, महावितरण; जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी; व महाऊर्जा यांनी निर्देशित केलेले अधिकारी यांच्या उपसमितीवर सदर योजनेच्या गुणवत्ता नियंत्रणाची जबाबदारी राहील.

८. केंद्र शासनाने सौर ऊर्जेवर आधारित पंपाकरिता ठरविलेल्या किमान तांत्रिक मानदंडानुसार सोलार मोडयुल्स् हे भारतीय बनावटीचे व आय्.ई. सी. (IEC) प्रमाणित किंवा तत्सम राष्ट्रीय अथवा आंतरराष्ट्रीय मानांकनानुसार प्रमाणित तसेच आर.एफ.आय.डी. (RFID) टॅग सुविधेसह पुरविणारे पुरवठादार असावेत. याबाबत महाऊर्जामार्फत साहित्य पुरवठादार कंपनीमध्ये साहित्याची तांत्रीक मानदंडानुसार पहाणी करुन साहित्यांच्या योग्यतेबाबत महावितरण कंपनीस माहिती देईल.

९. विहीर / कूपनलिका व पाण्याची पातळी तसेच पीक प्रकार इ. यानुसार तांत्रिक सर्वेक्षण करून वास्तविक (actual) सौरकृषी पंप क्षमता ठरविण्यासाठी अधीक्षक अभियंता, महावितरण; जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी, तसेच महाऊर्जा यांनी निर्देशित केलेले अधिकारी यांची उपसमिती प्रत्येक जिल्ह्यात स्थापन करण्यात येईल. या उप समितीकडून तांत्रिक सर्वेक्षणाचे व सौर कृषिपंप क्षमता ठरविण्याचे काम करुन घेईल.

१०. जिल्हास्तरीय समितीने पात्र ठरविलेल्या लाभार्थ्यांच्या यादीनुसार महावितरण कंपनी मार्फत महाऊर्जाच्या समन्वयाने योजनेची अंमलबजावणी करण्यात येईल.

११. नवीन व नवीकरणीय ऊर्जा मंत्रालय, भारत सरकार यांनी ठरविलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार सौर कृषिपंपाचा हमी कालावधी हा ५ वर्षांचा असणे व सोलर मोडयुल्स्ची वॉरंटी १० वर्षांची असणे आवश्यक आहे. यासाठी आवश्यक अटींचा कंत्राटामध्ये समावेश करण्यात येईल तसेच सौर कृषिपंपासाठी पुरवठादाराकडून ५ वर्षांसाठीचा सर्वंकष देखभाल व दुरुस्ती करार (रु.१००/-च्या स्टॅम्प पेपरवर) महावितरण कंपनी कडून नोटराईज्ड करून घेण्यात येईल.

१२. लाभार्थी हिस्सा प्राप्त झाल्यानंतर संबंधित लाभार्थ्यास सौरकृषीपंप बसविण्यासाठी बँकेकडून लाभार्थ्यांच्या नावे घ्यावयाचे कर्ज व त्याची परतफेडीची जबाबदारी महावितरणची राहील.

१३. नैसर्गिक आपत्तीमुळे सौर कृषिपंपाचे नुकसान झाल्यास त्यासाठी विमा उतरविण्यात येईल. विम्याच्या हप्त्याच्या रकमेचा समावेश कर्जाच्या रकमेत करण्यात येईल.

१४. सौर कृषिपंप आस्थापित झाल्यानंतर तो संबंधीत लाभार्थ्यास हस्तांतरीत करण्यात येईल. त्यानंतर त्याची दैनंदिन देखभाल व देखरेख करण्याची जबाबदारी संबंधीत लाभार्थींची राहील.

१५. सौर कृषिपंप आस्थापित झाल्यानंतर त्याचा आस्थापना (Installation) व कार्यान्वित (Commissioning) अहवाल अधीक्षक अभियंता, महावितरण; जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी; तसेच महाऊर्जा यांनी निर्देशित केलेले अधिकारी यांची उपसमितीद्वारे करण्यात येईल.

१६. सौरकृषीपंप कार्यान्वित (Commissioning) झाल्याचे अहवाल महावितरणकडून प्राप्त झाल्यावर महाऊर्जा केंद्र शासनाकडे वित्तिय सहाय्याच्या रक्कमेची मागणी करुन सदर निधी महावितरण कंपनीस अदा करेल.

१७. प्रकल्पाच्या प्रगती अहवालानुसार वित्तीय सहाय्य प्राप्त होणार असल्यामुळे राज्य शासनास एकत्रित प्रगती अहवालासह उपयोगिता प्रमाणपत्र रवाना करणे आवश्यक आहे. त्यामुळे उर्वरित पुढील वित्तीय सहाय्य टप्प्या-टप्प्याने उपलब्ध करून देण्यात येईल. याबाबतीत उचित कार्यवाही करण्याची जबाबदारी महाऊर्जा व महावितरणची राहील.

१८. आस्थापित सौर कृषिपंपाची यादृच्छिक (Random) पद्धतीने तांत्रिक तपासणी महाऊर्जामार्फत करण्यात येईल.

१९. योजनेची अंमलबलावणी करताना त्यासाठी आवश्यक असणारे अर्जाचे विहित नमुने, आस्थापना अहवाल, उपयोगिता प्रमाणपत्र व अनुषंगिक बाबी महावितरणमार्फत व तांत्रिक तपासणी नमुना महाऊर्जामार्फत निर्गमित करण्यात येतील.

८. अपारंपरिक ऊर्जा स्त्रोतांपासून ऊर्जा निर्मितीला प्रोत्साहन देण्यासाठी हरित ऊर्जा निधी स्थापन करण्यात आला आहे. औद्योगिक व वाणिज्यिक वीज ग्राहकांवर दि.०६.०४.२००४ पासून प्रति युनिट ४ पैसे व दि.०१.०५.२००८ पासून प्रति युनिट ८ पैसे प्रमाणे वीज विक्रीकर आकारण्यात येतो. या सुधारणा महाराष्ट्र वीज विक्री कर अधिनियम, १९६३ मध्ये करण्यात आल्या आहेत. यानुषंगाने, सन २०१३-१४ अखेर रु. २५५६.०० कोटी निधी राज्याच्या एकत्रित निधीत जमा झालेला आहे. सौर कृषिपंप ही योजनादेखिल हरित ऊर्जा योजनेअंतर्गत येत असल्याने राज्यातील शहरी भागातील रिलायन्स एनर्जी, टाटा पॉवर व बेस्ट या कंपन्याकडील औद्योगिक,वाणिज्यिक व इतर वर्गवारीतील ग्राहकांकडून महावितरण कंपनीकडील शहरी भागातील औद्योगिक व वाणिज्यिक वर्गवारीतील ग्राहकांकडून अतिरिक्त वीज विक्रीकरापोटी (Additional TOSE) प्रति युनिट १.०४ पैसे वसूल करावा लागेल. अधिनियमातील

तरतूदीनुसार या रकमेचा विनियोग, ऊर्जेची पुर्ननिर्मिती करता येण्यायोग्य व अपारंपरिक ऊर्जा स्त्रोतांच्या निर्मितीच्या योजनांची अंमलबजावणी करण्यासाठी करावयाचा आहे. या योजनेसाठीचा राज्यशासनाचा हिस्सा हरित ऊर्जा निधीमधून भागविण्यात यावा. तसेच, सदर योजनेस प्रशासकीय मान्यतादेखिल देण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३५/१४६१, दिनांक ६.२.२०१५तसेच वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १४३/२०१५, दिनांक २६.३.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१५०३२७१८३१३४१५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Parker
Suryakant V

Digitally signed by Parkar Suryakant V
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy & Labour, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Parkar Suryakant V
Date: 2015.03.27 18:52:03 +05'30'

( सु. व. पारकर )

कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मंत्री / सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (नियोजन ), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक,सर्व मंत्रालयीन विभाग.
१०.सर्व विभागीय आयुक्त.
११.सर्व जिल्हाधिकारी.
१२.मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा.
१३.महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
१४.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१५.सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने)

१६.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ, सुत्रधार कंपनी मर्या., मुंबई

१७.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या., मुंबई.

१८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या., मुंबई.

१९.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या., मुंबई.

२०.महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे.

२१.उप सचिव / ऊर्जा-३, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

२२.ऊर्जा उप विभागातील सर्व कार्यासने, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

२३.निवड नस्ती, ऊर्जा-७, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.